विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार - सन २०१९ व श्री.पु.भागवत पुरस्कार - सन २०१९ जाहीर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुरस-२०२०/प्र.क्र.८ (भाग-१)/भाषा-३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक : १२ फेब्रुवारी, २०२०**

वाचा :-

१. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.विंदापु-१०१४/प्र.क्र.११२/२०१४/भाषा-३, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५ व १२ जुलै, २०१८.

२. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.श्रीपुभा-१०१४/प्र.क्र.११३/२०१४/भाषा-३, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५.

प्रस्तावना :-

मराठी साहित्य /वाङ्मय क्षेत्रात भरीव व मोलाची कामगिरी करणाऱ्या नामवंत साहित्यिकास सन २०१९ या वर्षासाठीचा विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार तसेच मराठी साहित्य निर्मिती क्षेत्रात लक्षणीय कामगिरी करणाऱ्या उत्कृष्ट प्रकाशन संस्थेस, सन २०१९ या वर्षासाठीचा श्री.पु.भागवत पुरस्कार जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मराठी साहित्य क्षेत्रात उल्लेखनीय कामगिरी करणाऱ्या नामवंत साहित्यिकास "विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार" प्रदान करण्याकरीता संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीच्या निर्णयानुसार **सन २०१९ या वर्षाचा विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार ज्येष्ठ साहित्यिक "अनुराधा पाटील"** यांना व मराठी साहित्य निर्मितीमध्ये लक्षणीय कामगिरी करणाऱ्या प्रकाशन संस्थेस "श्री.पु.भागवत पुरस्कार" प्रदान करण्याकरीता संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीच्या निर्णयानुसार **सन २०१९ या वर्षाचा श्री.पु.भागवत पुरस्कार "पद्मगंधा प्रकाशन, पुणे"** या संस्थेस जाहीर करण्यात येत आहे.

२. विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्काराचे स्वरुप **रु.५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त) रोख, मानचिन्ह व मानपत्र** असे असून, श्री.पु.भागवत पुरस्काराचे स्वरुप **रु.३.०० लक्ष (रुपये तीन लक्ष फक्त) रोख, मानचिन्ह व मानपत्र** असे आहे.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च मागणी क्रमांक झेडएफ-२, २२०५, कला व संस्कृती ०० १०२ कला व संस्कृती प्रचालन (०१) (०३) सर्वोत्तम पुस्तकांसाठी प्रोत्साहन (कार्यक्रम), ५० इतर खर्च (२२०५ ३१९९) या लेखाशीर्षखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षात मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी होणाऱ्या खर्चासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व सहायक लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना

अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यासही या आदेशाद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र. २०२००२१२११०००११०३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Marathi Language
Date: 2020.02.12 14:08:34 +05'30'

**(अपर्णा अ. गावडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
५. मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६. मा.सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५. सचिव (मराठी भाषा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१६. संचालक (माहिती व वृत्त) , माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१७. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१८. अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ, नागपूर,
१९. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई,
२०. संचालक, राज्य मराठी विकास संस्था,मुंबई,
२१. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२२. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
२३. सर्व अवर सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. भाषा - ३ (संग्रहार्थ).